**ग्रामीण रुग्णालय, टोकावडे जि. ठाणे येथील मुख्य इमारतीच्या किरकोळ फेरफार अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा २०१५/प्र.क्र.३६०/आरोग्य ३(अ)**
गो.ते.रुग्णालय संकुल इमारत, १० वा मजला,
मंत्रालय, मुंबई-१
तारीख: १२ ऑक्टोबर,२०१५.

वाचा :-

आरोग्य सेवा संचालनालयाचे पत्र क्र संआसे /कक्ष-३/टे-६/ग्रारुटोकावडेमुइबांधकाम/९३४२-४३/१५. दिनांक १०/०९/२०१५.

**प्रस्तावना :-**

आरोग्य सेवा संचालनालयाच्या संदर्भाधीन पत्रान्वये ग्रामीण रुग्णालय टोकावडे जि. ठाणे येथील मुख्य इमारतीच्या किरकोळ फेरफार कामाच्या रु. ४०,००,०००/- (रु. चाळीस लक्ष) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती करण्यात आली आहे. आराग्य सेवा संचालनालयाने विनंती केल्याप्रमाणे ग्रामीण रुग्णालय ,टोकावडे जि. ठाणे येथील मुख्य इमारतीच्या किरकोळ फेरफार कामास प्रशासकीय मान्यता देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते .

**शासन निर्णय:-**

ग्रामीण रुग्णालय,टोकावडे जिल्हा-ठाणे येथील मुख्य इमारतीच्या किरकोळ फेरफार कामाच्या रु.४०,००,०००/- (रु.चाळीस लक्ष) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधिन राहुन प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. कामासाठीच्या जागेची उपलब्धतता,योग्यता व जागा पुरेशी आहे की नाही याबाबतची खात्री आरोग्य संस्था प्रमुखांनी करावी.

२. सदर अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्टया मान्यता ही सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संबंधित सक्षम अधिका-यांकडून करण्यात यावी.

३. काम सुरु करण्यापूर्वी आरोग्य विभागाच्या सक्षम अधिका-यांकडून सदर अंदाजपत्रक साक्षांकीत करुन घेण्यात यावे तसेच अंदाजपत्रकात सर्वसाधारण वर्णन, चेकलिस्ट इ.बाबींचा समावेश करणे आवश्यक आहे.

सदर बांधकामावरील खर्च खालील लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा.

**लेखाशिर्ष**

४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०२- ग्रामीण आरोग्य सेवा.
०४- सार्वजनिक आरोग्य
२००- इतर कार्यक्रम पंचवार्षीक योजनातंर्गत योजना
(००) (०१)- प्रमुख बांधकामे
५३- मोठी बांधकामे (४२१० ०१४१)

सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ४३३/१५/इमा-३ दि. २१/०९/२०१५ अन्वये प्राप्त सहमतीने व वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक - विअप्र १०.०८८ प्र.क्र ७०/२००८/विनीयम दिनांक १५ मे २००९ सोबतच्या परिशीष्ट भाग - पहिला उपविभाग - पाच मधील अनु.क्र -१ परिच्छेद क्र. १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१५१००९१३३४३०२८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shekhar Vasantrao Dhawale
Digitally signed by Shekhar Vasantrao Dhawale
DN: CN = Shekhar Vasantrao Dhawale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.10.12 11:02:17 +05'30'

(शेखर ढवळे)
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. संचालक , आरोग्य सेवा, मुंबई
२. अति. संचालक रुग्णालये (राज्यस्तर) आरोग्य सेवा मुंबई
३. उपसंचालक आरोग्य सेवा मुंबई मंडळ मुंबई.
४. जिल्हा शल्य चिकीत्सक , ठाणे
५. वैद्यकीय अधिक्षक , ग्रामीण रुग्णालय टोकावडे , जि.ठाणे
६. कार्यकारी अभियंता , सा. बां. विभाग क्र.२ , ठाणे
७. महालेखापाल १/२ महाराष्ट्र (लेखा व लेखापरिक्षा)/ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपुर.
८. वित्त विभाग (विनीयम कार्यासन/कोषा-५/अर्थसंकल्प) मुंबई.
९. अवर सचिव (अर्थसंकल्प) साव्रजनिक आरोग्य विभाग , मंत्रालय मुंबई.
१०. निवडनस्ती (आरोग्य ३-अ)